**अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांच्या अधिनस्त नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - मुवाढ २०२४/(प्र.क्र.५७/२०२४)/लाक्षेवि(आस्था)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२,

दिनांक: १६/०४/२०२४

**संदर्भ:-** १. जलसंपदा विभाग, शा.नि.क्र. आढावा-१००२/(३३५/२००२)/आ(प्रशि), दि.०६/०२/२००३.

२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मुवाढ-२०२३/ (प्र.क्र.११०/२०२३) / लाक्षेवि(आस्था), दि.०४/१०/२०२३.

३. वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/०२/२०२४.

४. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांचे पत्र जा.क्र.लाक्षेविप्र/आ.२/मु.वाढ/१०७४/२०२४, दि.२८/०२/२०२४ व जा.क्र. लाक्षेविप्र/आ.२ / मु.वाढ / १९८६/२०२४, दि.१०/०४/२०२४.

**प्रस्तावना -**

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांच्या अधिनस्त विभागीय कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८ पदांना संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०९/२०२३ ते दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये त्यांचे अंतर्गत असलेल्या विभागीय कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८ पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केलेली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

संदर्भ क्र.४ येथील दि.२८.०२.२०२४ च्या प्रस्तावास अनुसरून, अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांचे कार्यालय अंतर्गत विभागीय कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८ पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय -

जलसंपदा विभागाच्या HRMS प्रणालीवर उपलब्ध माहिती विचारात घेऊन खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांचे कार्यालय अंतर्गत विभागीय कार्यालयातील कार्यालयनिहाय आकृतीबंधानुसार मंजूर नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढीसाठी प्रस्तावित पदांची संख्या<br>नियत अस्थायी आस्थापनेवरील मुदतवाढ मंजूर पदांची संख्या | मुख्य लेखाशीर्ष व उपलेखा शीर्ष |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर | २८ | मागणी क्रमांक आय -५,<br>४७०१, मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च<br>८०, सर्वसाधारण,<br>१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका,<br>००१, संचालन व प्रशासन,<br>(०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान (वेतन)<br>(०४)(०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य)<br>०१, वेतन,<br>३२, अंशदाने,<br>(४७०१ आय २०४) |
| | **एकूण** | **२८** | |

१. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांच्या कार्यालयांतर्गत आकृतीबंधानुसार २८ पदे नियत अस्थायी आस्थापनेवरील आहेत. आता या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील २८ मंजूर पदांना ती सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही, तसेच ती पदे सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर झालेल्या ४५२९७ पदांच्या मर्यादेत आहेत या अटीच्या अधीन राहून दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.
२. उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
३. ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसतील, तसेच पदे व्यपगत झालेली नसतील.
४. रुपांतरीत आस्थापनेवरील पदे, त्या पदावर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालू राहतील.
५. जलसंपदा विभागाच्या HRMS प्रणालीवर उपलब्ध माहितीनुसार पदांची संख्या / पदामधील घट / पदामधील वाढ / सेवानिवृत्ती इ. माहिती अंतिम / अचूक आहे असे गृहित धरून तसेच याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची असल्याचे गृहीत धरुन पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.
६. या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत विहित वेळेत सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.२१/०२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२४०४१६१५५४३२९७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2024.04.16 16:06:43 +05'30'

**( प्रज्ञा मेश्राम )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट “अ” व विवरणपत्र - १**

**प्रत,**

१. महालेखापाल-१, (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-२, (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपुर.

३. वित्त विभाग,(व्यय-१२)/अर्थ-१९ / वित्तीय सुधारणा-१ / विनियम ), मंत्रालय, मुंबई.
४. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक.
६. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर

त्यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ  देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील.

७. कोषागार अधिकारी, अहमदनगर.
८. आ(प्रशि)कार्यासन/अर्थ-१/अर्थ-२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. लाक्षेवि (आस्था) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक मुवाढ - २०२४/(प्र.क्र.५७/२०२४)/लाक्षेवि(आस्था), दि.१६/०४/२०२४ चे सहपत्र.

परिशिष्ट- "अ"

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर यांच्या अंतर्गत नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढीसाठी प्रस्तावित पदांची संख्या<br>नियत अस्थायी आस्थापनेवरील मुदतवाढ मंजूर पदांची संख्या | मुख्य लेखाशीर्ष व उपलेखा शीर्ष |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर | २८ | मागणी क्रमांक आय - ५,<br>४७०१, मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च<br>८०, सर्वसाधारण,<br>१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका,<br>००१, संचालन व प्रशासन,<br>(०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान (वेतन)<br>(०४)(०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य)<br>०१, वेतन,<br>३२, अंशदाने,<br>(४७०१ आय २०४) |
| | **एकूण** | २८ | |

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2024.04.16 16:07:04 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र-०१

शासन निर्णय क्रमांक - मुवाढ - २०२४/(प्र.क्र.५७/२०२४)/लाक्षेवि(आस्था), दि. १६/०४/२०२४ चे सहपत्र.

| अ.क्र. | पदांचे नाव | दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे |
|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता व प्रशासक | १ |
| २ | उप विभागीय अभियंता/ उप विभागीय अधिकारी/ (सहायक अधीक्षक अभियंता) | १ |
| ३ | स.अ.श्रेणी-२/शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता | ३ |
| ४ | अधीक्षक | १ |
| ५ | लघुलेखक(उच्चश्रेणी) | १ |
| ६ | प्रथम लिपिक | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ८ | टंकलेखक | ३ |
| ९ | सहायक आरेखक | १ |
| १० | मुख्य आरेखक /अनुरेखक | १ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| १२ | संगणक | १ |
| १३ | नाईक | १ |
| १४ | वाहनचालक | १ |
| १५ | शिपाई | ३ |
| १६ | चौकीदार | १ |
| | **एकूण** | **२८** |

PRADNYA SHYAM MESHRAM

Digitally signed by PRADNYA SHYAM MESHRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=327f48fc91004ad3ef5a6ebc89e6964b30682a841a4ee2d95624fca82a93ab47, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=226F0D03348BA1C546030C101D31C947F7247A2CB501F8CAFE8198EF7E26E956, cn=PRADNYA SHYAM MESHRAM
Date: 2024.04.16 16:07:20 +05'30'

**(प्रज्ञा मेश्राम)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**